अपंग व्यक्तींना शासन सेवेत वर्ग-3 व
वर्ग-4 च्या पदावर आरक्षण ठेवण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक :एसआरव्ही-1098/सीआर-35/98/16-अ,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक :- 28 सप्टेंबर, 1998.

**पहा** :- 1) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही-1077/3576/1433/16-अ, दिनांक 23 मे, 1978.
2) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र.एसआरव्ही-1081/सीआर-15/16-अ, दिनांक 7 सप्टेंबर, 1982.

**परिपत्रक** :- अपंग व्यक्तींना शासकीय सेवेतील वर्ग-3 व वर्ग-4 (गट "क" आणि गट "ड" ) पदावरील नियुक्तीसाठी 3% आरक्षण ठेवण्याबाबतची योजना सन 1978 पासून राज्यात लागू करण्यात आली आहे. या संदर्भात शासनाने वेळोवेळी सूचना निर्गमित केलेल्या आहेत तसेच अपंगांसाठी विहित केलेल्या आरक्षणानुसार पदे भरण्याबाबतची कार्यवाही करण्याविषयी देखील वेळोवेळी शासनाने सूचित केलेले आहे.

आता केंद्र शासनाचा अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, 1995 लागू झालेले असून सदर अधिनियमातील कलम 33 नुसार अपंगांना शासन सेवेत 3% आरक्षण ठेवणे बंधनकारक करण्यात आलेले आहे. या संदर्भात अनुसरावयाची कार्यपद्धती शासन परिपत्रक क्र.एसआरव्ही-1097/प्र.क्र.12/97/16-अ, दिनांक 2 मे, 1998 अन्वये विहित करण्यात आली आहे. या परिपत्रकाच्या परिच्छेद 4(ब) मध्ये स्पष्ट करण्यात आले आहे की, गट "क" आणि गट "ड" च्या पदाचा संवर्ग निहाय आढावा घेण्यास काही कालावधी लागणार असल्यामुळे जैसे थे परिस्थितीत सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी करण्यात यावी.

या परिपत्रकाद्वारे अशा सूचना देण्यात येत आहेत की, गट "क" आणि गट "ड" मधील पदांवरील नियुक्तीसाठी 3% आरक्षण ठेवण्यासंबंधीच्या शासन निर्णय क्र.एसआरव्ही-1077/3576/1433/16-अ, दिनांक 23 मे, 78 अन्वये देण्यात आलेल्या आदेशांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शि.शा.हिरीजगनेर,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव/ अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ औरंगाबाद, नागपूर,
* प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
* प्रबंधक, लोकायुक्त आणि उप लोकायुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
अध्यक्ष, महाराष्ट्र दुय्यम सेवा निवड मंडळ, मुंबई,
सचिव, सर्व प्रादेशिक निवड मंडळ,
सचिव, राज्य निवड मंडळ,
सर्व नगर पालिकांचे मुख्य अधिकारी,
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
सर्व शासकीय महामंडळे, कंपन्या, स्थानिक स्वराज्य संस्था व शासन अनुदानित मंडळे/ संस्था,
संचालक, सेवायोजन, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

* पत्राने.

एच-911(5,000-9-98)